**अतितात्काळ/कालमर्यादा**
**स्पीड पोस्टाने**

क्रमांक-बाविआ-२००६/प्रक्र-५७४/वित्त -४
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- १० फेब्रुवारी ,२०११

प्रति,
मुख्य कार्यकारी अधिकारी
जिल्हा परिषद( सर्व )

**विषय- बाराव्या वित्त आयोगाच्या १ ते १० हप्त्यात प्राप्त निधीतील अखर्चीत रक्कम व या निधीतून मिळालेल्या व्याजाच्या रकमेतील अखर्चीत रक्कम खर्च करण्यास दि.३१/३/२०११ पर्यंत मुदतवाढ मिळणेबाबत.**

*संदर्भ-१) शासन पत्र क्रमांक -बाविआ २००६/प्र.क्र.५७४/वित्त-४, दिनांक- २ ऑगस्ट,२०१०.*
*२) शासन पत्र क्रमांक -बाविआ २००६/प्र.क्र.५७४/वित्त-४, दिनांक- ८ नोव्हेंबर,२०१०.*

पंचायत राज संस्थांच्या बळकटीकरणासाठी बाराव्या वित्त आयोगांतर्गत जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायत या तिन्ही स्तरासाठी सन २००५-१० मध्ये ग्राम विकास विभागामार्फत सर्व जिल्हा परिषदांना १ ते १० हप्त्यांत एकूण रु.१९८३.०० कोटी एवढे अनुदान वितरीत करण्यात आले आहे.

२. सदर वितरीत निधीतून झालेल्या खर्चाचा आढावा घेण्यासाठी दिनांक ३१ जानेवारी २०११ रोजी मंत्रालयात आयोजित करण्यात आलेल्या सर्व विभागांच्या उपायुक्त (विकास) यांच्या बैठकीत असे निदर्शनास आले की, एकूण वितरीत रु.१९८३ कोटी पैकी रु.१९७२.२४ कोटी इतका निधी दिनांक ३१ डिसेंबर,२०१० अखेर पर्यंत खर्च झाला असून रु.१०.७६ कोटी इतका निधी अजूनही अखर्चित आहे. १२ व्या वित्त आयोगांतर्गत वितरीत सर्व निधी संदर्भिय पत्रान्वये दिलल्या अंतिम मुदतीतच म्हणजे ३१ डिसेंबर, २०१० अखेरपर्यन्त खर्च होणे आवश्यक असतानाही अद्याप रु.१०.७६ कोटी इतका निधी अखर्चित आहे ही अत्यंत गंभीर बाब आहे.

३. काही जिल्हा परिषदांनी बाराव्या वित्त आयोगांतर्गत १ ते १० हप्त्यात वितरीत निधीतील अखर्चित रक्कम व त्यावर प्राप्त व्याजाच्या रकमेतील अखर्चित रक्कम खर्च करण्यास मुदतवाढ मिळणेबाबत शासनास विनंती केलेली आहे. त्यानुषंगाने खालील निर्णय घेण्यात आला आहे.

बाराव्या वित्त आयोगांतर्गत वितरीत केलेल्या १ ते १० हप्त्यात वितरीत निधीतील अखर्चित रक्कम व त्यावरील प्राप्त झालेल्या व्याजाच्या रक्कमेतील अखर्चीत रक्कम शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांनुसार खर्च करण्यास या पत्रान्वये **दिनांक ३१ मार्च, २०११ पर्यन्त मुदतवाढ देण्यात येत आहे**.

४. त्यानुषंगाने केलेल्या हप्तानिहाय खर्चाची आकडेवारी नमूद असलेले उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालयास व प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपूर्वी न चुकता शासनास पाठवावे. व्याजाच्या खर्चाचे स्वतंत्र विनियोग प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. अखर्चित असलेला रु.१०.७६ कोटी इतका निधी व १२ व्या वित्त आयोगाच्या प्राप्त निधीवर झालेल्या व्याजाची रक्कम दिलेल्या वाढीव मुदतीतच म्हणजे दि. ३० मार्च, २०११ पर्यन्त खर्च होणे आवश्यक आहे. ही मुदतवाढ अंतिम आहे. अखर्चित निधी खर्च करण्यास दिलेल्या या मुदतवाढीनंतर यापुढे कोणत्याही परिस्थितीत मुदतवाढ मिळणार नाही याची गंभीर नोंद घ्यावी.

६. या उपरही ज्या जिल्हा परिषदांकडून दिनांक ३१ मार्च,२०११ नंतर निधी अखर्चित राहिल, त्या जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांना जबाबदार धरण्यात येईल याची त्यांनी गंभीर नोंद घ्यावी. त्यामुळे बाराव्या वित्त आयोगांतर्गत आपल्या जिल्हा परिषदेकडील (जि.प./पं.स/ग्रा.प स्तरावरील) सर्व अखर्चित निधी व त्या निधीवर प्राप्त व्याजाची रक्कम **दि.३१ मार्च,२०११** अखेर १०० टक्के खर्च होईल याची आपण सर्वतोपरी दक्षता घ्यावी, असे आपणास सूचित करण्यात येत आहे.

( प्रतिभा मा.पाटील)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी अग्रेषित.

१) सर्व विभागीय आयुक्त, यांनी या प्रकरणी त्यांचे अधिनस्त सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी याची स्वत: बैठक घेऊन योग्य ती कार्यवाही तात्काळ करावी, ही विनंती.
२) सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद,
३) सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी(पंचायत) जिल्हा परिषद
४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
५) महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
६) महालेखापाल ( लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-१/२ , मुंबई/नागपूर
७) मुख्य लेखा परीक्षक स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
८) सह मुख्य लेखा परीक्षक स्थानिक निधी लेखा, (सर्व विभाग)
९) निवड नस्ती, कार्यासन क्र-वित्त-४, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय,मुंबई